ई- साहित्य प्रकाशन

१८ मे २००९ (अंक २७ )



# ग्रीष्म

संपादक

सारंग भणगे ( पुणे )

अतिथी संपादक

कवी ग्रीष्म ( मुंबई )

सह संपादक

सोनाली घाटपांडे ( पुणे )

स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

नाम गुम जायेगा ( ठाणे )

आनंद माने ( सोलापूर )

सचिन काकडे ( मुंबई )

रेणूका रेपाळ (अमेरिका )

सुरुची नाईक ( नागपूर )

अहं ब्रह्मास्मी ( पुणे )

या अंकात वाचूया -

- ग्रीष्म कविता

*हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..*

**netaksharee@gmail.com**




## संपादकीय

काजळघोट अंधारात
मिणमिणती चिमणी
थरथरत्या ओंजळीत
पिवळ पिवळ पाणी

चूल विझलेली
कवाची उपाशी
वाळक्या पोराला
गुंजभर लापशी

सुरकुतल्या आसवात
सुकलेला कोंब
उजाड शीवारातत
उलट्या हाताची बोंब

विहीरतळाशी बेडूक
मोकाट फिरतात
उताण्या मोटा
स्वप्नात झुरतात

नुसत वाळवंट
अफाट फुटलेल
निवडुंगा खाली
आभाळ दाटलेल

ओशाळली पहाट
दमानच उठते
किरणांच्या थारोळ्यात
डबकुले नटते

गोठ्यातले बैल
घासतात खुरं
बामणाच्या ताम्हणास
फसतात गुरं

उर्मट उन्हाची
ऊठली काहिली
म्हाता-यान दुपार
शेवटचीच पाहिली

छपराच फुटक खापर
रांजणाला चिरा
भावकीतल्या आडात
शेवाळला झरा

म्हाता-याच्या तिरडीला
तेरडाही महाग
जळालेल्या देहाला
तहानेचीच आग

\- **सारंग भणगे**

## तिघी मधली ............मधली मी

सकाळ दूपार अन संध्याकाळ
चालती गुंफून हाती हात
वेगळ्या असून बहिणी
मी एक त्या तिघी मधली !!

पहिली, दुसरी की तिसरी
तिघी मधली मी कुठली
तिघी मधली मी मधली
मधली, मधली मी मधली !!

एक सर रिमझिम आठवांची
दुरून साजरी स्वप्नपरी दुजी
मी दोघींना धरून उभी
मधली, मधली मी मधली !!

सकाळ सरली तगमग मनी
जगून घेते म्हणून तापही
चटके चटके मला चंदनी
मधली, मधली मी मधली !!

भर दुपारी बनून सावली
मीच माझी बघ झाले आई
राबराबता स्मित हसणारी
मधली, मधली मी मधली !!

झेलू दे मज किरणे माथी
तिच्या उद्यासाठी सावली
धम्मक पिवळी कांचनपरी
मधली, मधली मी मधली !!

सकाळ घेऊन काखोटी
संध्येची मी बनेन काठी
तिघी मधली मी कुठली
मधली, मधली मी मधली !!

**- स्वाती फडणीस**

## ईमारतींचे प्रेमगीत

स्वप्नाळू डोळयांच्या ईमारती
शांततेच्या प्रतिक्षेत,

बोलायचे आहेत त्यांनाही
प्रेमाचे दोन चार शब्द

पण..
दोन्हींच्या मधे
उगाचच
काळा कभिन्न लांबलचक रस्ता ;
त्यावरून असंख्य वाहनांची
अविरत धावपळ..

मग
इमारतींचे संदेश——
सावलीच्या रुपाने पाठवले जातात,

त्या बोलत नाहीत

पण अनुभवतात
परस्परांच्या सुखद सावल्या

रात्री..
सावल्या एकमेकांत गुंतत जाऊन
उरते सारयांची एकच प्रचंड सावली

शांत रस्त्यांवर आता
निःशब्द अंधार वाहू लागतो
आणि
शांततेआडून
फ़क्त इमारतींचे प्रेमगीत दरवळू
लागते

**समीर गुलशनाबादी**

## कातरवेळ

कातरवेळ अशीच असते
एकटेपणात अजून भर घालणारी
पोकळीला व्यापणारी
मनाला चटका लावणारी
झालं गेलं सांगणारी
काळजाला भिडणारी
आतले पापुद्रे काढणारी
जखमेला ठेचणारी
एकट्यात गाठणारी

जगताना मारते ती
मारताना हसते ती
हसताना म्हणते ती
भेटलास ना आज
काय छद्मी हसते पुन्हा

मी विकल
लाचार पुरता कह्यात जातो तिच्या
मला काही कळायच्या आत
फ़सतो चक्रव्युहात आठवणीच्या

**-कल्पी जोशी**

## घन आले घन गेले

घन आले घन गेले
तरी बरसले नाही
पिवळ्या माळरानावर मग
कोणी फेकली लाल शाई ?

दिवसाच्या धमन्यातुनी
ऊष्ण ऊन वाहते सळसळा
लावित जाते अलगद
लाल रंगाचा लळा

पानगळीतून गळून जाती
आयुष्याची सारी दुःखे
लवलवत्या पात्यावरती
आंकुरती नवी सुखे

बहरलेला पळस
ओथंबलेला गुलमोहर
पांगि-याची लाल पाती
माझीच तर कथा गाती

**- डॉ. मुक्ता पाठक शर्मा**



**छमछम ....**

पारावरची संध्याकाळ,
रानमातीचा निवाळलेला गंध
बेधुंद श्यामल वाऱ्याच्या लहरी
तिची पारावर बसून वाट बघणारा मी,
ती आत्ता येईल , येईल आणि क्षणात वातावरण मोहरून जाईल
आज एवढा वेळ का लागतोय ? श्या... ! ही रोज असंच करते,
कित्ती वेळा सांगितले वेळेवर येत जा,
पण हिला आज एवढा उशीर का झाला ?
ओढा ओलांडून व्यवस्थित येईल ना की... की....
हजार वेळा सागितलंय माझ्याबरोबर ये म्हणून, पण नाही...
जावं का परत ओढ्यापर्यंत ? की ती मागल्या वाटेने येईल, नको
इथेच थांबू या...
अचानक हा सूर्य ढगाआड का गेला, आणि आणि हा वारा जोरात का वहातोय...?
कुठे असेल ही...? नेहमी वाट बघायला लावते,
उद्या मी सुद्धा उशीरा येईन, बसू देत हिला सुद्धा वाट बघत, मग समजेल...
अरे देवा ! ह्या पावसाला सुद्धा आत्ताच यायचं होतं का ?
हीने आत्ता ओढ़ा ओलांडला असेल का ?
ही पण ना रोज असा माझा जीव वेशीला टांगते...
कोण येते तिकडून “प्रिया” ! नाही ती कधी साडी घालून येत नाही
मग़ मग़ कॊण असेल
पुढे जाऊन बघू का ? हो असंच करूया
“कोण आहे रे तिथे ?”
अरे इथे कोणीच नाही
कदाचित माझा भास असावा



आणि इतक्यात इतक्यात मागून पैंजणांची “छमछम”
मी मागे वळून बघितले आणि काळीज एकदम
धस्स्स्स्स्स्स ...!
कोणीही नाहिये ....!
आणि मागुन तिने अचानक तिचे हात माझ्या छातीभोवती गुंडाळले...
“वेडी आहेस का तू ? जीव अगदी वेशीला टांगलास...”

**संतोष नार्वेकर**





## गुलमोहर बहरला

ग्रीष्म किती हा तप्त, रणरणता
अंगाची लाही लाही उडवणारा
पण मी ग्रीष्माची वाट पहाते
कारण गुलमोहर फुलांनी बहरते

बागडती यावर फुलचुष पक्षी
पळापळ करती खारी
येती लालचुटूक, नारिंगी फुले
डोकावती हळूच हरित पाने

जसे अग्निशिखा होऊन पेटलेले
वैशाख वणवा बनलेले
मज भावते त्याचे तेजस्वी रूपडे
हिरवाईतही त्याचे असे पेटणे

**- स्वप्ना कोल्हे**

## जीवन की मरण

रक्त गोठवणारी थंडी
पारा शून्याच्या जवळपास
बर्फाची पातळ चादर
जणूकाही पाण्यालाही आवर
थोडस ऊनही ऊब देत होत
थंडीची झाडी दूर सारत होत
झाडांची पाने जळून जात होती
उघड्यावर असलेली माणसेही मरून जात होती

वाढता वाढ्ता उन्हे वाढली
झाडानाही पालवी फुटली
पाणीही वाहू लागल
घामाने बेजारही होऊ लागल
रखरखीत उन्हाळा
आंबाही बहरला
अंगाची लाहीलाही
पाण्यासाठी दिशा दाही
झाडे तेव्हाही जळतच होती
माणसे तेव्हाही मरतच होती

पावसाची वाट
एक थेंब रान मोकाट
अंगावर शिरशिरी
मनात हूरहूर भारी
सणाची जोडी
नदी नाल्याची दुधडी
झाडे तेव्हाही वहातच होती
माणसे तेव्हाही मरतच होती

**- प्रसन्ना जी के**

## कवडसा !!!

आज खिडकीतून सूर्यकिरणांचा कवडसा
माझ्या घरात पड्ला !
क्षणभर तू असल्याचाच भास झाला
वाटले , “तू” आशिर्वाद देतोयस मला
आणि म्हणतोस मंद स्मित करत,
“किती हा त्रागा , किती हा झगडा ?,
... स्वतःशीच ?”

तू फ़क्त एवढ़ेच बोलून निघून गेलास
मी चट्कन उठून तो कवडसा हातात धरण्याचा प्रयत्न केला,
पण त्याचे काही थेंब माझ्या हातात सामावले !
आणि त्या निरभ्र आकाशाकडे पाहून मी म्हणाले ,

“मला कळले ‘तुला’ काय म्हणायचे ते ! ”

**शिरीन ( पुणे)**



## आभाळच इथे फ़ाटले  होते

कुणीतरी आकाशाचे रंग
का सारे लुटले होते
काळजात साठलेल्या राखेत
वादळ दबून बसले होते !!

वारा नव्हता , पळाले ढगही
तारेही सारे तुटले होते
मनातल्या मनात ठसठसणाऱ्या
कळांचे पेव फ़ुटले होते !!

हसण्या रडण्याचेही असतील
तीळ तीळ मारण्याचेही नियम होते
शिवून नशीब कुठवर पुरवणार
सारे आभाळच इथे फ़ाटले होते !!

**Oceanheal (डॉ विजय बेकनळकर)**



## सावज

दूर सूर्य अस्ताला निघालेला
साऱ्या आसमंताला अंधारात बुडवून
पूर्ण चराचराला काळ्या गर्तेत लोटून
आता सुरू होईल रातकिड्यांचा वावर
काळोख चिरीत जाईल घुबडांचा घुत्कार

आणि जागा होईल तो , काळोखाचा  अनभिषिक्त सम्राट
आपल्या वेळेची प्रतिक्षा करत दडून बसलेला
हलकेच कानोसा घेत गाठेल तो आपले सावज
आणि घेईल झेप करून टाकेल त्याचा चोळामोळा
हलकीशी झटापट , दबलेले आवाज
आणि मग सारे अगदी थंड

आता अंधार अगदी शांत शांत
शांतता कापत जातोय एक हुंदका
त्या हुंदक्याला आशा उजेडाची
सूर्य पुन्हा उगवेल या विचाराची

पण

पण तिचा सूर्य कधीच नाही उगवणार
तिच्या अंगणात कधीच प्रकाश नाही पडणार
तिचा सूर्य लोपला क्षितिजा मागे
चिर विश्रांती  घेण्याला
पुन्हा कधी न उगवण्याला

**-- सुप्रिया चाफ़ेकर**





नाव : कवी ग्रीष्म
छंद : कविता, कथा लेखन,
अभिनय, नाटक आणि भटकंती

जन्म ग्रीष्मातला म्हणून तेच टोपणनाव लेखनात वापरतो, बालपण संगमनेरला आजी आजोबांसोबत गेल, आजीच्या जात्यावरच्या ओव्यांनी ग्रीष्मला कवितांची गोडी लावली. घरात वारकरी संप्रदायाचे सहभागी आसल्याने भारूड , किर्तन ऐकून गोडी वाढ्ली. शालेय जीवनात हीच आवड छंद बनला, इथेच कविता रूजली आणि फुलली देखील. शिक्षिका सौ. करुणा पाटील आणि मोहिते मैडम भोसले मैडम यांनी माझ्यातील कलाकार ओळखला आणि प्रोत्साहन दिलं मार्गदर्शन केलं. शाळेतली मैत्रीण श्रद्धा आपटे हिला माझ्या कविता आवडायच्या अनेक वेळा हट्ट करून तिने माझ्याकडून कविता घेतल्या अगदी शाळेपासून कविता लिहीतोय कॉलेज जीवन वडगावपान मधील ज्यूनियर कॉलेज पासून ते अंधेरीच्या भवन्स कॉलेज पर्यंत स्पोर्ट्स आणि नाटकांनी बहरून गेलं होतं. माझे मित्र सिद्धार्थ जाधव आणि अंबर हडप यांच्यासोबत नाटकात केलेल्या कामांमूळे लेखनाला एक नवीन दिशा मिळाली. माझं लेखन फुलायला लागलं कवितांना वेगळी धार मिळाली त्यात माझी मैत्रीण सोनाली संभेराव हिचा मोठा हातभार. और्कुट वर काव्यांजली आणि मराठी कविता या कम्युनिटीज नी मला नवी ऑळख दिली. मी अनेक नाटकं लिहीली आहेत कथा लिहील्या आहेत अनेक कवीसंमेलनात कविता सादर केल्या आहेत. शिवाजी राजे आराध्य दैवत, मंगेश पाडगावकर आदर्श तर सौमित्र आणि संदीप खरे आवडते कवी.

पुढील महिन्यात प्रकाशित होणा-या प्रातिनिधीक कविता संग्रहात मान्यवरांसोबत माझ्याही दहा कवितांचा समावेश आहे.

शेवटच्या श्वासापर्यंत लिहीत रहायचंय...

**- कवी ग्रीष्म**

**ग्रीष्म**

ढग येतो ढग जातो
सूर्य जातो , चंद्र येतो
कुंडलीच्या घरांना शनी त्रास देतो

ढग आला ढग गेला
ढग गोरा, काला ढग
गरीबाच्या झोपडीत
दुष्काळाची जागे धग ...

सुर येतो सुर जातो
सुख दुखाचे गीत गातो
दिस येई दिस जाई
पापण्या भेटीसाठी कोरड्या होई

जिव येतो जिव जातो
आयुष्याचा जमा खर्च होतो
कीडा येतो कीडा जातो
उगाच माणूस माणसाला त्रास देतो

ऋतु येतो ऋतु जातो
कधी वसंत कधी शिशिर हेमंत होतो
ऋतु येतो ऋतु जातो
कधी पालवी कधी फुलोरा देतो

ग्रीष्म असा माझा वेडा
हा पावसाची ओढ लावून जातो
कधी पांगारा कधी गुलमोहराला .. फुलवुनी
क्षणात पसार होतो

**---कवी ग्रीष्म**

**आग पावसामधली**

बाहेर सर्वत्र शांतता होती
अंगाला चटके लागत होते
मला कळलं की हा उन्हाळा आहे
काही दिवसांनी वातावरण बदललं
थंडीमुळे मन गारव्यात अडकलं
मला कळालं की हा हिवाळा आहे
'कालच माझ्या शेजारच्या शेतक-याने
गळफ़ास लावून आत्महत्या केली '
आणि मला कळालं की हा पावसाळा आहे

ऐकलंय की त्या शेतक-याने त्याच्या
मुलीला मोठ्या खुषीने शिकवले होते
आता ती स्वतःच्या लेकरांचे भविष्य घडवू शकते
आणि जर हुंड्यासाठी तिच्या
सासरकडील माणसं तिला छळतील
तर स्वतःला जाळण्याआधी
'मी स्वखुषीने आत्महत्या करीत आहे'
असं ती स्वतःच्या हाताने लिहू शकते

पावसाअभावी एका शेतक-याने
आपली जीवनयात्रा संपविली
'आज तक चा दावा आहे
त्यांनी ही बातमी सर्वप्रथम दाखविली
आणि त्याच शेतक-याच्या बायकोने
लेकरांसंगे स्वतःला जाळून घेतले
हे दाखविण्या ऐवजी त्यांनी
फ़ैशन शो ची रेकॉर्डींग दाखवली

असो कालची गोष्ट, जग लगेच विसरेल
पण त्या शेतक-याची गाय अजून जीवंत आहे
स्वतःच्या वासराचं रक्षण करण्यास ती समर्थ आहे
जनावर म्हणतो , आपण त्यांना
आणि तीच माणसापेक्षा कैक पटीनं सुखी आहेत

तुम्हाला काय वाटतं ....?

**- निशब्द देव**

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्याव्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करून वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फ़ॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतू असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू . मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहोचवण्याचा आमचा संकल्प सिद्धीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे netaksharee@gmail.com